राज्य उत्पादन शुल्क विभागातील उप-अधीक्षक, राउशु, गट-"ब" (राजपत्रित) या संवर्गातील पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांकः इएसटी-१७१७/प्र.क्र.१०५/राउशु-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२.
दिनांक : ०९ जून, २०२०.

वाचा -

१) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही २०१५/प्र.क्र.१५६/कार्या.१२, दि.२८.०४.२०१५.

२) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही २०१७/प्र.क्र.११४/कार्या.१२, दि.१५.०६.२०१७.

३) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.टिआरएन-०८१९/प्र.क्र.५४/सीपीटीपी-ब, दि.१७.०९.२०१९.

**शासन आदेश -**

उप अधीक्षक (गट-ब), राज्य उत्पादन शुल्क (राजपत्रित) {वेतनश्रेणी S-१५ : (४१,८००-१,३२,३००), ७ व्या वेतन आयोगानुसार} या संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने, राज्यसेवा परीक्षा-२०१५ द्वारे शिफारस केलेले एक उमेदवार आणि राज्यसेवा परीक्षा-२०१६ द्वारे शिफारस केलेले दोन उमेदवार हे एकत्रित परीविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-४ (सीपीटीपी-४) करिता उपस्थित होते. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-४ (सीपीटीपी-४) च्या तुकडीचे प्रशिक्षण दि.३१.०७.२०१९ रोजी पूर्ण झालेले असून सदर उमेदवारांना, वैद्यकीय तपासणी, चारित्र्य पडताळणी व जातवैधता प्रमाणपत्र, इत्यादी बाबींची पूर्तता व पडताळणी करण्याच्या अधीन राहून म.ना.से. (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम-९ (४३) मध्ये विहीत केलेल्या परिविक्षाधीन या संज्ञेच्या व्याख्येनुसार, केवळ तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.

नियुक्त अधिकाऱ्यांची नावे व पदस्थापनेचे ठिकाण खालीलप्रमाणे आहे:-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव व मूळ प्रवर्ग | नियुक्ती चा प्रवर्ग | CPTP-४ अंतर्गत उप-अधीक्षक, राउशु संवर्गातील ज्येष्ठता क्र. | वाटप झालेला महसूली संवर्ग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. आदित्य गोविंद पवार, खुला | खुला | १ | पुणे | उप अधीक्षक, युनायटेड स्पिरीट्स, पुणे. |
| २ | श्री. विश्वजीत अरूण देशमुख, इ.मा.व. | इ.मा.व. | २ | कोकण-१ | उप अधीक्षक, रायगड. |
| ३ | श्री. हर्षवर्धन बाळकृष्ण शिंदे, खुला | खुला | ३ | नाशिक | उप अधीक्षक, मे. सीग्राम डिस्टिलरी (परनार्ड रिकार्ड इं.प्रा.लि.), नाशिक. |

३. वरील उमेदवारांची नियुक्ती ही परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या व खालील विहित अटी व शर्तीच्या अधीन असेल.

i. महाराष्ट्र नागरी सेवा ( ज्येष्ठतेचे विनियमन ) नियमावली १९८२ व त्यामध्ये वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणांच्या अधीनतेने त्यांची ज्येष्ठता राहील.

ii. सर्व उमेदवारांनी त्यांच्या नियुक्तीच्या पदावर नियुक्तीच्या आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत रुजू व्हावयाचे आहे. या कालावधीत उमेदवारांनी नियुक्ती स्वीकारली नाही तर त्यांना ज्येष्ठता मिळणार नाही व त्यांचे नाव कोणतीही पूर्वसूचना न देता या विभागाच्या/महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या निवडसूचीतून कमी करण्यात येईल. काही अपरिहार्य कारणास्तव त्यांना रुजू होण्यास मुदतवाढ हवी असल्यास, तसे सकारण लेखी कळवून मुदतवाढ घेणे आवश्यक आहे.

iii. जर उमेदवारांच्या जात वैधता प्रमाणपत्रामध्ये काही तांत्रिक मुद्यांची पूर्तता करणेचे अधीन राहून वैधता प्रमाणपत्र दिल्याबाबतचा उल्लेख नमुद असेल तर त्या तांत्रिक मुद्यांची पुर्तता तात्काळ करणे उमेदवारांवर बंधनकारक राहील. यामध्ये झालेला / होणारा विलंब हा उमेदवाराची सदर पदावरील नियुक्ती रद्दबातल करण्यास कारणीभूत ठरेल, याची उमेदवारांनी नोंद घ्यावी.

iv. उपरोक्तप्रमाणे नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांनी सेवा प्रवेश नियमानुसार आयोजित केल्या जाणाऱ्या विभागीय परिक्षा, प्रादेशिक भाषा परिक्षा, संगणक हाताळणी परीक्षा या विहित मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

v. परिविक्षाधीन अधिका-यांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा विहित विभागीय परिक्षा परिविक्षाधीन कालावधीत उत्तीर्ण न केल्यास अथवा त्यांची वर्तणुक अयोग्य, संशयास्पद आढळल्यास तो/ ती कोणतीही पूर्व सूचना न देता सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

vi. उमेदवार त्यांच्या सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असतील त्यांनी शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि.०२.१२.१९९७ मधील तरतुदीनुसार शासनास किमान १ (एक) महिन्याची आगाऊ नोटीस देणे किंवा पूर्वसूचनेऐवजी १ महिन्याचे वेतन शासनाकडे भरणा करणे आवश्यक राहील. तसेच या उमेदवारांची सेवा समाप्त करावयाची असेल त्यावेळी शासनाकडूनही अशी एक महिन्याची आगाऊ नोटीस संबंधित अधिकाऱ्यास दिली जाईल. मात्र गैरशिस्त, सेवा नियमांचा भंग इ.कारणासाठी सेवा समाप्त करताना वरील उमेदवारास नोटीस देण्याचे शासनास बंधनकारक राहणार नाही. हे नोटीशीचे नियम वेळोवेळी होणाऱ्या नियमातील बदलांच्या अधीन राहतील.

vii. शासन निर्णय वित्त विभाग क्र.अनियो १००५/१२६/सेवा-४, दि.३१.१०.२००५ व क्र.अंनियो-२०१५/(NPS)/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.०६.०४.२०१५ व त्यामध्ये वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणांमधील तरतुदीनुसार १ नोव्हेंबर २००५ रोजी किंवा त्यानंतर ज्या अधिकारी/ कर्मचारी यांची शासकीय सेवेत नियुक्ती होईल त्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू राहील. सध्या अस्तित्वात असलेली निवृत्ती वेतन योजना म्हणजेच महाराष्ट्र नागरी सेवा ( निवृत्तीवेतन) नियम १९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४ आणि सध्या अस्तित्वात असलेल्या सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना या उमेदवारांना लागू राहणार नाही. मात्र जे शासकीय कर्मचारी १ नोव्हेंबर २००५ पुर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असतील, त्यांना शासन परिपत्रक वित्त विभाग,क्र. अनियो-१००६/८७/सेवा दि.१२.१.२००७ मध्ये नमुद केलेल्या अटींच्या पुर्ततेच्या अधीन राहुन महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू राहतील.

viii. शासन सेवेत कार्यरत उमेदवारांचे गोपनीय अभिलेख नियुक्तीपूर्वी तपासण्याबाबत आयोगाने दिलेल्या सुचनेच्या अनुषंगाने, शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांस गोपनीय अभिलेख तात्काळ सादर करण्याबाबत कळविण्यात येत आहे. यापूर्वी शासकीय सेवेत असलेल्या उमेदवाराने त्यांचे गोपनीय अहवाल १ महिन्याच्या आत शासनाकडे जमा करावे. सदर गोपनीय अभिलेख्यांच्या तपासणीच्या अधीन उपरोक्त उमेदवारास नियुक्ती देण्यात येत आहे.

ix. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी २०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब, दि.१२ डिसेंबर, २०११ मधील तरतुदीनुसार सरळसेवा भरतीमध्ये ज्या उमेदवारांची निवड विशिष्ट मागास प्रवर्गासाठी आरक्षित असलेल्या जागांवर झालेली आहे व ज्यांनी नियुक्तीपुर्वी शासनाकडे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नाही, अशा उमेदवारांस त्यांच्या जात प्रमाणपत्राची वैधता तपासण्याच्या अधीन राहुन तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे. नियुक्ती आदेश प्राप्त झाल्यानंतर अशा उमेदवाराने नियुक्ती आदेशाच्या दिनांकांपासून सहा महिन्याच्या आत आपल्या जात प्रमाणपत्रांची वैधता, संबंधित जात पडताळणी समितीकडून करुन घेणे बंधनकारक राहील. संबंधित उमेदवाराने नियुक्ती स्विकारताच जात वैधता तपासणी करण्यासाठीचा प्रस्ताव संबंधित जात पडताळणी समितीकडे सादर करणे बंधनकारक राहील व जात पडताळणी समितीने दिलेल्या पोचपावतीची साक्षांकित प्रत संबंधित उमेदवाराने नियुक्ती प्राधिका-यास सादर करावी. मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार, संबंधित जात पडताळणी समितीने त्यांचे पडताळणी प्रस्ताव सहा महिन्याच्या आत निकाली काढावेत. जात पडताळणी समितीने जात प्रमाणपत्र अवैध ठरविले, तर संबंधित उमेदवारास दिलेले नियुक्तीचे आदेश त्वरीत रद्द करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्याबाबत, आणि त्या उमेदवाराविरुध्द महाराष्ट्र

अनुसुचित जाती, अनुसुचित जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग (जातीचे प्रमाणपत्र देण्याचे व त्यांच्या पडताळणीचे विनियमन) अधिनियम, २००० यातील तरतुदीनुसार कारवाई करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्याबाबत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना कळविण्यात येत आहे.

x. उमेदवारास एक पत्नी/पती हयात असताना दुसरा विवाह करता येणार नाही. तसेच शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआव्ही-२०००/प्र.क्र.१७/२०००/१२, दि.०१.०७.२००५ नुसार त्यांनी लहान कुटुंबाचे प्रमाणपत्र सादर करावे.

xi. उपरोक्त उमेदवाराने नियुक्तीच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत स्वग्राम घोषित करावा.

xii. सदर उमेदवाराची नियुक्ती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असून त्यांना चारित्र्य व पूर्वचारित्र्य पाडताळणीचा अहवाल असमाधानकारक असल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांची नियुक्ती कोणतेही कारण न देता १ महिन्याची नोटीस देऊन समाप्त करण्यात येईल.

xiii. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या.१२, दि.२८.०४.२०१५ अन्वये सरळसेवेने नियुक्त उमेदवारांस महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूल विभाग वाटप नियम, २०१५ व सदर नियमावलीमध्ये वेळोवळी केलेल्या सुधारणा लागू असून, त्यांना त्यांचेनावासमोर दर्शविलेल्या महसूली विभागाचे सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्वमान्यतेने वाटप करण्यात आले आहे. सदर नियमातील तरतुदीनुसार सरळसेवेने नियुक्त झालेल्या उमेदवारांना वाटप झालेल्या विभागीय महसूली संवर्गात विहीत कालावधी पूर्ण करणे आवश्यक राहील.

उपरोक्त अधिका-यांस त्यांच्या संवर्गाचे विभागीय परिक्षा नियम, सेवा प्रवेश नियम तसेच इतर सर्व महत्वाचे सेवाविषयक नियम/बाबी ज्ञात करुन देण्याची कार्यवाही आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी करावी. संबंधित कार्यालय प्रमुखांना सूचित करण्यात येते की, त्यांनी उपरोक्त उमेदवाराचे सेवाभिलेख तयार करून त्यात आवश्यक त्या नोंदी कराव्यात. सेवेत हजर होणाऱ्या उमेदवाराबाबतचा अहवाल आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी शासनाला तात्काळ सादर करावा. वरीलप्रमाणे नेमणूक झालेल्या उमेदवारास वेळोवेळी सेवांतर्गत प्रशिक्षण कार्यक्रमास पाठविण्याबाबतची व्यवस्था आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी करावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६०९१४५८०५४७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Shahaji Yadav

Digitally signed by Sudhakar Shahaji Yadav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e782c1e59acd749fc48c691d7a8c477d6ac39c1904204f442b52d728d48a67a, cn=Sudhakar Shahaji Yadav
Date: 2020.06.09 15:53:47 +05'30'

**( सु. श. यादव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:**

१) मा. मंत्री ( राज्य उत्पादन शुल्क ) / मा.राज्यमंत्री (राज्य उत्पादन शुल्क ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव (राज्य उत्पादन शुल्क) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग/ वित्त विभाग/ महिला व बालकल्याण/ सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई.
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
५) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) सर्व विभागीय आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क (आयुक्त, राउशु यांचेमार्फत)
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८) जिल्हा अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, नाशिक/रायगड/पुणे.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा ) १/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/रायगड/पुणे (आयुक्त, राउशु यांचेमार्फत)
११) सर्व संबंधित उमेदवार/ निवड नस्ती-राउशु-१.

*******************